माहितीचा अधिकार अधिनियम २००५ अंतर्गत

माहिती उपलब्ध करुन देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: रामाआ-२०१४/प्र.क्र.४७/अर्थ-१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: ९ सप्टेंबर, २०१५

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक बांधकाम विभागातील एका उप विभागांतर्गत दि. १.४.२०१३ ते ३१.१२.२०१३ या कालावधीमध्ये कोणकोणती कामे करण्यात आली व सदर कामे कोणकोणत्या शासकीय योजनेंतर्गत करण्यात आली तसेच कामानिहाय किती निधी मंजूर होता व किती निधी खर्च करण्यात आला, इ. बाबतची माहिती, माहितीचा अधिकार अधिनियम २००५ खाली उप विभागीय स्तरावर विचारण्यात आली होती. परंतु तशी माहिती संबंधित अर्जदारास उपलब्ध करुन देण्यात आलेली नव्हती. त्यामुळे सदर अर्जदाराने प्रथम अपिलीय अधिकाऱ्याकडे अपील दाखल केले होते. या संदर्भात प्रथम अपिलीय प्राधिकाऱ्याने निदेश देऊनही संबंधित जन माहिती अधिकाऱ्याने माहिती उपलब्ध करुन दिली नव्हती. त्यामुळे अर्जदाराने माहिती आयुक्तांकडे द्वितीय अपील दाखल केले होते. सदर अपिलावरील सुनावणीच्यावेळी संबंधित जन माहिती अधिकारी यांनी अर्जदारास माहिती उपलब्ध करुन न दिल्यामुळे माहिती आयुक्तांनी सदर जन माहिती अधिकाऱ्यास दंड ठोठावला होता.

सदर अपिलाच्या सुनावणीच्यावेळी माहिती आयुक्तांनी mahapwd.com या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संकेतस्थळाला भेट दिली असता, ते अत्यंत संथ गतीने चालत असल्याचे दिसून आले. तसेच अर्थसंकल्पाविषयीची व हाती घेतलेल्या कामांची सन २००९-२०१० पर्यंतचीच माहिती वेबसाईटवर उपलब्ध असल्याचे आढळून आले. त्यामुळे माहितीचा अधिकार अधिनियम २००५ च्या कलम ४(१)(B) नुसार स्वयंप्रेरणेने प्रकट करावयाची माहिती दरवर्षी कशी अद्ययावत ठेवता येईल, यावर तपशीलवार चर्चा करण्यासाठी मा.माहिती आयुक्तांनी या विभागाच्या सचिवांना त्यांच्या कार्यालयात पाचारण केले होते. या संदर्भात मा.माहिती आयुक्तांशी झालेल्या चर्चेनुसार माहितीचा अधिकार अधिनियम २००५ खाली माहिती उपलब्ध करुन देण्याबाबत पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**परिपत्रक :-**

माहितीचा अधिकार अधिनियम २००५ च्या कलम ४(१)(B) अंतर्गत विविध १७ प्रकारची माहिती प्रत्येक कार्यालयाने स्वयंप्रेरणेने प्रकाशित करावयाची आहे. जसे, कार्यालयाचे नांव, उद्दीष्ट, कामे, तेथील कर्मचाऱ्यांची पदे व त्यांची कामे, निर्णय प्रक्रिया, पर्यवेक्षणाची पध्दत, योजनांचे तपशील,

अर्थसहाय्याच्या रकमा व लाभार्थींचा तपशील इ. संदर्भातील माहिती कॉम्प्युटर नेटवर्कद्वारे अथवा इतर सोयीच्या मार्गाने जनतेला उपलब्ध करुन द्यावयाची आहे. त्याप्रमाणे प्रत्येक उप विभागीय कार्यालयाने त्यांच्या कार्यालयामार्फत हाती घेतलेल्या सर्व कामांची माहिती, कामांच्या प्रशासकीय मान्यतेचा दिनांक, कामाची किंमत, काम पूर्ण होण्याचा कालावधी, कामांच्या कार्यारंभाचा दिनांक, त्या कामांसाठी उपलब्ध केलेली तरतूद व खर्च, मान्य निविदांचा तपशील व ठेकेदाराचे नाव इ. बाबतची माहिती त्या त्या कार्यालयाने त्यांच्या कार्यालयातील सूचना फलकावर लावावी. यासाठी आवश्यकते प्रमाणे तक्ते तयार करुन ते सूचना फलकावर लावावेत. ही माहिती सूचना फलकावर ठेवल्यामुळे माहितीच्या अधिकाराखालील अर्जांची संख्या कमी होईल व अशाप्रकारची माहिती देण्यास अधिकारी/कर्मचाऱ्यांचा वेळ वाया जाणार नाही.

त्याचप्रमाणे विभागाच्या mahapwd.com या संकेतस्थळावर विभागाने हाती घेतलेल्या कामांची माहिती व अर्थसंकल्पाविषयीची माहिती कार्यकारी अभियंता यांनी उपलब्ध करुन द्यावी. ही माहिती दरवर्षी अद्ययावत करुन चालू आर्थिक वर्षातील माहिती संकेत स्थळावर उपलब्ध राहील याबाबत दक्षता बाळगावी.

माहितीचा अधिकार अधिनियम २००५ खाली प्राप्त झालेले अर्ज, त्यावर प्राप्त होणारी अपीले व त्या अनुषंगाने करावयाची कार्यवाही याबाबतची माहिती संबंधित कार्यालयातील सर्व अधिकाऱ्यांना/कर्मचाऱ्यांना असणे आवश्यक असल्यामुळे सर्व कार्यालयांनी त्यांच्या कर्मचाऱ्यांना कार्यालयाच्या सोयीप्रमाणे प्रशिक्षण द्यावे. जेणेकरुन या कायद्याखाली प्राप्त होणाऱ्या अर्जांच्या संदर्भात योग्य ती माहिती विहित वेळेत उपलब्ध करुन देता येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१५१००११५०५५४९५१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Fulchand Sakharam Meshram

Digitally signed by Fulchand Sakharam Meshram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Fulchand Sakharam Meshram
Date: 2015.10.01 15:10:27 +05'30'

**( फु. स. मेश्राम )**

शासनाचे आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव

**प्रत :-**

१. सर्व मुख्य अभियंते (विद्युतसह), सार्वजनिक बांधकाम विभाग.

२. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.

३. सर्व अधीक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम मंडळे

४. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई

५. सर्व कार्यकारी अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग

६. सर्व सह सचिव/उप सचिव /अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

७. निवड नस्ती.